# नवा हिंदुधर्म

## अनुक्रमणिका


१ ग्रंथकर्त्याची प्रस्तावना
२ श्री. प. प. केवलानंद स्वामीमहाराजांचा पुरस्कार
३ विद्वानांचे अभिप्राय
४ शुद्धिपत्र

### भाग पहिला—प्रमाणविचार

| प्रकरण | नाव | पृष्ठे |
|---|---|---|
| १ | नव्या हिंदुधर्माची आवश्यकता | १—५ |
| २ | धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा | ६—१२ |
| ३ | धर्मनिर्णयाची जुनी मीमांसा पद्धति | १३—२२ |
| ४ | धर्म हा अपूर्व व अदृष्ट आहे काय ? | २३—३७ |
| ५ | धर्म आणि पुरुषबुद्धि | ३७—५५ |
| ६ | नव्या हिंदुधर्माचें अधिष्ठान | ५६—६७ |
| ७ | हिंदु कोणास म्हणावें ? नि हिंदुस्थान कोणाचा ? | ६८—७७ |
| ८ | देशकालविचार | ७८—९० |

### भाग दुसरा—व्यवहारविचार

| | | |
|---|---|---|
| ९ | 'नायमात्मा बलहीनेन लभ्यः' | ९१—९८ |
| १० | उत्थानयोग | ९९—११० |
| ११ | वर्णव्यवस्था | ११०—१३२ |
| १२ | जातिसंस्था | १३२—१५१ |
| १३ | जात्युत्कर्ष | १५१—१६१ |
| १४ | व्यवसाय | १६२—१७४ |
| १५ | शिवाशिव नि विटाळ | १७४—१८७ |
| १६ | आहार | १८८—२०४ |

### [illegible]—विवाहविचार

| | | |
|---|---|---|
| | [illegible]ाश्रम | २०५—२२२ |
| | [illegible]हसंस्कार | २२३—२४१ |
| | [illegible] | २४२—२५९ |


शके १८६३ ] मूल्य ३ [illegible]

| | | |
|---|---|---|
| २० | गोत्रप्रवरविचार. | २५९–२७४ |
| २१ | विधवाविवाह. | २७५–२८६ |
| २२ | घटस्फोट. | २८६–२९४ |
| २३ | एकपत्नीत्व व स्त्रियांचे अधिकार | २९४–३०३ |


## भाग चौथा–समष्टिविचार


| | | |
|---|---|---|
| २४ | संस्कार व वेदाधिकार. | ३०४–३१२ |
| २५ | शुद्धि व व्रात्यस्तोम संस्कार | ३१२–३२५ |
| २६ | अंत्यसंस्कार, अशौच व श्राद्ध | ३२५–३३४ |
| २७ | दिनचर्या | ३३५–३३९ |
| २८ | सण व शिष्टाचार | ३४०–३५४ |
| २९ | व्रतें व नेमधर्म | ३५४–३६८ |
| ३० | दानें | ३६८–३८२ |
| ३१ | पापपुण्य, स्वर्गनरक व प्रायश्चित्त | ३८३–३९० |


## भाग पांचवा–तत्त्वविचार


| | | |
|---|---|---|
| ३२ | नीतिधर्माची सापेक्षता | ३९१–४०२ |
| ३३ | नव्या हिंदुधर्माचें तत्त्वज्ञान | ४०२–४१२ |
| ३४ | ईश्वराचें स्वरूप | ४१३–४१८ |
| ३५ | सगुण ईश्वर व अवतारवाद | ४१९–४२८ |
| ३६ | भक्तिमार्गाचें नवें स्वरूप | ४२९–४५१ |
| ३७ | हिंदुधर्माची थोरवी | ४५१–४५६ |
| ३८ | नवहिंदुधर्मसूत्रावली | ४५६–४६० |
| ३९ | संघटनेचा संदेश | ४६०–४७६ |
| ४० | उपसंहार | ४७७–४८० |


## परिशिष्टें


| | | |
|---|---|---|
| १ | विचारवंतांची मतें | ४८१–५०० |
| २ | विषयसूचि | ५०१–५१२ |


——०——

# ग्रंथकर्त्यांची प्रस्तावना

खिस्ताब्द १९२० या वर्षी सिंहस्थी श्रीक्षेत्र नाशीक येथें महाराष्ट्र हिंदुधर्म परिषदेचें संस्मरणीय अधिवेशन भरलें. त्यात मांडलेल्या योजने-प्रमाणें आम्ही हिंदुधर्म, हिंदुसमाज नि हिंदु संस्कृति या क्षेत्रात गेलीं एकवीस वर्षे प्रवचनें व पुस्तकें यांच्याद्वारें आणि अन्य साधनानीं जागृतीचें कार्य करीत आहों. श्री गुरुवर्य प. प. केवलानंदस्वामी महाराज (प. नारायणशास्त्री मराठे) यांचें हार्दिक साह्य आणि पाठिंबा आमच्या या कार्यास प्रथमपासूनच आहे. हुतात्मा स्वामी श्रद्धानंद यांच्या हस्तेंपूर्वी आम्ही प्राज्ञपाठशाळेचे प्रचारक या नात्यानें संस्थेच्या वतीनें दहा वर्षे प्रवचनें व व्याख्यानें देऊन समाजात जागृति केली. अस्पृश्योद्धार, शुद्धिकरण, क्षत्रियवैश्यांचें अस्तित्व इत्यादि विषयावर केसरींतून लेख लिहिले आणि त्यांचीं चार पुस्तकेंहि प्रसिद्ध केलीं.

हुतात्मा स्वामी श्रद्धानंदांच्या हस्तेंपासून आम्ही सर्वस्वीं हिंदुधर्म-सुधारणा आणि हिंदुसमाज संघटना याविषयीं एकनिष्ठपणें स्वातंत्र्यानें जागृति करूं लागलों. 'हिंदुसमाज समर्थ कसा होईल' हें पुस्तक १९२७ सालीं प्रसिद्ध केलें. पुढें तीन वर्षांनीं त्याचीच दुसरी आवृत्ति काढली. 'आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष—पूर्वार्ध' हा ग्रंथ १९२९ सालीं प्रसिद्ध केला. ब्राह्मणातील पोटजातींच्या एकीकरणाविषयीं जागृति करून त्यावरहि दोन पुस्तकें लिहिलीं. श्री. गांधीजींनीं येरवडा तुरुंगात अस्पृश्यतानिवारणार्थ आणि मंदिरप्रवेशार्थ जेव्हा प्राणांतिक उपोषण आरंभिलें, तेव्हा सनातनीवर्ग 'धर्म अपरिवर्तनीय आहे, ईश्वरहि त्यात बदल करूं शकत नाहीं' असा प्रचार करूं लागला. आचारधर्म परिस्थितिसापेक्ष कसा बदलत आलेला आहे, हें साधार दाखविण्याकरिता आम्ही धर्मशास्त्राचें मंथन करून तें १९३३ सालीं लोकापुढें मांडलें. प्रस्तुतचा 'नवा हिंदुधर्म' हा ग्रंथ आमच्या एकवीस वर्षांच्या धर्म आणि समाज यांच्या अभ्यासाचें, निरीक्षणाचें आणि आजवर लिहिलेल्या विचारांचें परिणतफळ होय. महाराष्ट्रात अस्पृश्यतानिवारण, शुद्धिकार्य, पोटजाति मोडणें इत्यादि आंदोलनें जोरात

चालू झाल्यामुळें सनातनी पंडित जागे झाले. सोनगीर येथील पंडित परिषदेमध्यें १९२४ सालीं परिवर्तनवादी व अपरिवर्तनवादी असे दोन पक्ष अगदी उघड झाले. परिवर्तनवादी पक्षाचें अध्वर्युत्व श्री. प. नारायणशास्त्री मराठे (केवलानंदस्वामी महाराज) यांचेकडे गेलें आणि अपरिवर्तनवादी पंडितांचें पुढारीपण काशीकर पंडितांचे अध्वर्यु प. लक्ष्मणशास्त्री द्रविडप्रभृतीकडे गेलें. या दोन पक्षांत एकवाक्यता होणें अशक्य आहे, असें दिसल्यानंतर परिवर्तनवादी पंडितांनीं 'धर्मनिर्णयमंडळ' या नांवाची संस्था स्थापन केली. तिच्या आद्य प्रस्थापकांमध्यें आणि घटकांमध्यें प्रस्तुत ग्रंथकार आहे. धर्मनिर्णयमंडळाच्या चर्चाविभागाचे निरंतरचे अध्यक्ष श्री प. प. केवलानंद स्वामी महाराज यांचें आग्रहास आजवर जसें वैचारिक साह्य झालें आहे, त्याचप्रमाणें यांहि ग्रंथास त्यांची प्रेरणा, त्यांची स्फूर्ति उपयोगी झाली आहे. धर्मनिर्णयमंडळाशीं संबद्ध असलेल्या महामहोपाध्याय प. पा. वा. काणे, विद्वद्रत्न डॉक्टर दप्तरी, श्री. नानासाहेब चापेकर, तर्कतीर्थ प. लक्ष्मणशास्त्री जोशी, तर्कतीर्थ प. र. गो. कोकजे, महामहोपाध्य प. श्रीधरशास्त्री पाठक, श्रौताचार्य धुंडिराज दीक्षित नापट प्रभृति विद्वानांच्या विचारांचें, चर्चेचें व त्यांनीं लिहिलेल्या ग्रंथांचें साह्य प्रस्तुत ग्रंथास अतीव झालेलें आहे, हें ठिकठिकाणीं पायटिपेंत उध्दृत केलेल्या ग्रंथोल्लेखांवरून ध्यानांत येईलच.

धर्मनिर्णयमंडळानें वेळोवेळीं परिषदेमध्यें जे एकमतानें निर्णय दिले त्या निर्णयाचें स्पष्टीकरण करणारा, नव्या कालाला आवश्यक असा हा 'नवा हिंदुधर्म' ग्रंथ आहे. हा ग्रंथ धर्मनिर्णयमंडळाचा म्हणून पुढें आलेला नसला, तथापि धर्मनिर्णयमंडळाची भूमिका व निर्णय हीं ध्यानांत घेऊन प्रस्तुत ग्रंथ लिहिलेला आहे.

धर्मनिर्णयमंडळाशीं संबद्ध नसलेले पण विचारानें मंडळाच्या भूमिकेवर असलेले प्रा. श्री. म. माटे, प्रा. पे. ना. वाटवे, डॉ सहस्रबुद्धे, प्रा. द. के. केळकर, श्री. का. न. केळकर, श्री. स्वा वीर तात्याराव व बाबाराव सावरकर प्रभृति विद्वानांच्या विचारांचें प्रतिबिंबहि प्रस्तुत ग्रंथांत पहावयास सांपडेल.

या अशा उपयुक्त प्रयास जोंवर श्रीशंकराचार्यांची नि जुन्या पंडितांची संमति नाहीं आणि सरकार मान्यता देत नाहीं तोंवर याचा काय उपयोग, असा प्रश्न पुष्कळ लोक करतात. त्यास उत्तर देणें अवश्य वाटतें. पहिली गोष्ट म्हणजे पीठस्थ शंकराचार्य हे आजच्या कालापासून फार मागें आहेत. आजच्या परिस्थितीचें ग्रहण त्यांना होत नसावें किंवा होत असलें तरी जुन्याचेंच समर्थन करणें त्यांना इष्ट वाटत असावें. श्रीक्षेत्र काशी येथें श्रीविश्वेश्वराच्या साक्षित्वाखालीं उपस्थित असलेल्या तीनशे सनातनी पंडितांच्या साह्यानें हिंदुस्थानातील चारी देशांच्या प्रमुख पीठस्थ शंकराचार्यांनीं जे निर्णय दिले ते पाहिले म्हणजे शंकराचार्य हे आजच्या परिस्थितीला अनुरूप कांहीं सांगतील अशी आशा करणें खपुष्पवत् आहे, हें स्पष्ट होतें. धर्माचार्यांनीं अखिल भारतवर्षीय ब्राह्मणमहासंमेलनामध्यें जे निर्णय दिले ते असे—

(१) स्त्री विवाहाची वयोमर्यादा आठ वर्षेच असावी. नऊ किंवा दहा वर्षें ही मध्यम ऋतुदर्शनापर्यंत गौण आणि त्यानंतर विवाह करणें सर्वथा निंद्य होय.

(२) ऋतु प्राप्त झाल्यानंतर कन्या वृषली होते. तत्बोधक वचनावरून ती धर्मकार्याला अयोग्य समजावी.

(३) पोटजातींतील विवाह निंद्य होत.

(४) मन्वादि स्मृतिकार हेच धर्मज्ञ होत. तेसुद्धा स्वातंत्र्यानें धर्मपरिवर्तन करू शकत नाहींत.

(५) नैवर्गिकांतील विधवाविवाह आणि घटस्फोट सर्वथा निषिद्ध समजावा.

(६) अस्पृश्यांची अस्पृश्यता ही जन्मसिद्ध आहे म्हणून ते देवालयें व सभा इत्यादीमध्यें प्रवेश करण्याला अयोग्यच होत. त्यांची अस्पृश्यता रक्षण केलीच पाहिजे.

(७) अस्पृश्यादिकांना भागवतधर्माची दीक्षा दिली तरी ती या जन्मीं जात्युत्कर्षाला उपकारक होत नाहीं.

(८) म्लेंच्छादिकांनीं बलात्कारानें ज्यांना बाटविलें असेल त्यांची शुद्धि तीन वर्षांचे आंत करावी.

(९) परदेशगमनाला प्रायश्चित्त असावें.

(१०) मालसंस्कार तीन पिढ्यापर्यंत प्रशस्त समजावा.

(११) चातुर्वर्ण्य जन्मसिद्ध आहे. इत्यादि.

हे निर्णय वाचून हिंदुधर्म आणि हिंदुसमाज याविषयीं तळमळ असणाऱ्यांनीं पीठस्थ आचार्य आणि सनातनी पंडित यांच्या नादीं यापुढे न लागणें हेंच योग्य नाहीं काय ? धर्माचरणाचा आणि देशकालाचा संबंध आहे, हें ज्यांच्या बुद्धीत शिरत नाहीं व परिस्थित्यनुसार आचार-धर्मांत परिवर्तन करणें म्हणजे सूर्याजी पिसाळगिरी करणें असें जे अग्रबुद्धांसारखें समजतात त्यांची समजूत विधाताहि घालूं शकणार नाहीं.

दुसरी महत्त्वाची बाब अशी कीं धर्माधर्मनिर्णयामध्यें शंकराचार्य पीठाचें स्थान सोळाव्या शतकापासूनच सुदृढ झालें ! आपापल्या सांप्रदायिक मताचा प्रचार करणें हेंच शंकराचार्यांचें काम होतें आणि धार्मिक क्षेत्रात निग्रहानुग्रहाचें कार्य हें तत्कालिन शिष्टांचें अर्थात् विद्वानांचें होतें. विद्वानांचा नि शिष्टांचा हा अधिकार शंकराचार्यांनीं बळकावलेला आहे. सांप्रतच्या परिस्थितींत तो अधिकार आता स्वाभाविकच लोकशाहीच्या तत्त्वानुसार ज्याचा त्याचेकडे येत आहे, ही गोष्ट अभिन--ीयच आहे. धार्मिक नि सामाजिक क्षेत्रातील निग्रहानुग्रहाचें कार्य पूर्वी विद्वानांच्या परिषदा करीत असत, क्षेत्रस्थ विद्वान् तें काम करीत हें कऱ्हाड येथील गिजरे घराण्याचे जे कागदपत्र प्रसिद्ध झाले आहेत ,यावरून उघड होतें. पूर्वीची तीच परंपरा धर्मनिर्णयमंडळातील पंडितां.ी आज चालविलेली आहे. धर्मनिर्णयमंडळाचें हें कार्य लोकमतपरिवर्तनार्थ आहे लोकमत प्रबळ झालें कीं सरकार मान्यता देतें असा आजवरचा अनुभव आहे. तात्पर्य, सर्व दृष्टीनें विचार केल्यास प्रस्तुतसारख्या ग्रंथांची उपयुक्तता व आवश्यकता निःसंदेह आहे

ज्यांना हिंदुधर्म, हिंदुसमाज, हिंदुसंस्कृति व हिंदुराष्ट्र यांची चाड आहे, ज्यांना हिंदुत्व अभिमानास्पद वाटतें, ज्यांना हिंदुराष्ट्राच्या प्राचीन परंपरेचा अभिमान आहे, ज्यांना हिंदुसंस्कृति विशेषत्वानें झळकावी असें वाटतें, त्यांचेकरिता हा ग्रंथ आहे. तसेंच जे हिंदु अज्ञान व अनिष्ट रूढि यामुळें पोळलेले व मागासलेले आहेत, ज्यांना पुढें येण्यास व कर्तृत्व

दारविर्न्यास वाव मिळाला नाहीं, ज्याच्यावर आजपर्यंत अन्याय झालेला आहे, अशा सर्व हिंदु घटकाच्या उत्कर्षाकरिता हा ग्रंथ लिहिलेला आहे. हिंदूतील बालाना, वृद्धाना, स्त्रियाना, पुरुषाना, साक्षराना व सुशिक्षिताना, अर्थात् अखिल हिंदूना खरें धर्मतत्त्व व रहस्य कळावें, याकरिता हा यत्न आहे. तो कितपत यशस्वी झाला हें वाचकानींच ठरवावयाचें आहे.

योगायोग.—हा ग्रंथ लिहिण्याची कल्पना शके १८६१ मध्यें सोलापुरास निश्चित केली. शके १८६२ च्या जेष्ठ शुद्ध प्रतिपदेपासून कार्तिक अखेर ग्रंथ लिहिण्याचें काम चालू होतें ग्रंथाचें लेखनादि कार्य चालू असता योगायोगानें कांहीं अकल्पित घटना घडल्या, त्याची थोडी माहिती प्रसगप्राप्त म्हणून देतों

आमचा या पूर्वीचा ग्रंथ 'आर्य सस्कृतीचा उत्कर्षापकर्ष—उत्तरार्ध' याविरुद्ध मुसलमानानी "धर्मभावना दुखावतात" म्हणून ग्रंथाच्या प्रसिद्धी' नतर एक वर्षानें चळवळ सुरू केली. कऱ्हाड, मिरज, तासगाव इत्यादि ठिकाणच्या मुसलमानाच्या निषेधपर सभाचीं हस्तपत्रकेंहि आमचेकडे आलीं! ग्रथलेखनास प्रारभ झाल्यावर एका रात्रीं आमच्या घराजवळच असलेल्या एका मशिदीवर "मुसलमानान्च्या धर्मभावना तुम्ही दुखविल्या म्हणून पाच दिवसात तुम्हास ठार करू" असें भित्तिपत्रक लावले गेलें आम्हाला स्वसरक्षणार्थ रक्षक ठेवणे भाग पडलें, शिवाय मिरज दरबारकडेंहि आम्हीं सरक्षण मागितलें त्या प्रमाणे दरबारनें तें दिलेंहि. विशेष गोष्ट म्हणजे या परिस्थितींत रा स्व सघाच्या सागली—मिरजेच्या स्वय सेवकानीं व्यक्तिश: आम्हास अतिशय सरक्षण देऊन साह्य केलें पुढें स्वस रक्षणार्थ रिव्हॉल्वरचा परवाना मागितला असता रेसिडेंटसाहेब कोल्हापूर याचेकडे अर्ज करा असें सागण्यात आलें मे रेसिडेंटसाहेब याचेकडे अर्ज केला असता रेसिडेंट कचेरीतून मिरज दरबारमार्फतच अर्ज पाठवा असें लिहून आलें. त्याप्रमाणें दिवाण कचेरींत अर्ज दिला शेवटी परवाना मिळाला नाहींच.

मुंबई सरकारनें 'आर्यसस्कृतीचा उत्कर्षापकर्ष, उत्तरार्ध, हा ग्रंथ १५ जुलै १९४० रोजीं आक्षेपार्ह ठरविला त्याबरोबर लगेच मिरज दरबारनेंहि ग्रंथ जप्त करून जतीकरिता पधरा ते वीस पोलिसाची एक पार्टीच दोन अधिकाऱ्यासह पाठविली.

जतीच्या वेळचा समग्र सत्य प्रकार आमच्या स्वाक्षरीनें केसरींत प्रसिद्ध झालाच आहे. जतीपासून मिरजेच्या पोलिसांनीं मिरजेस शक्य तेवढें कमी राहा असें आत्मीय भावनेनें सांगण्यास प्रारंभ केला. श्री गणेशोत्सवाहून जो परत येतों तों आक्टोबर ५ रोजीं रावबहादूर दिवाण साहेब मिरज यांनीं ' मिरजेंत राहूं नका, अशी तोंडी ताकीद दिली आणि हें वृत्तपत्रात प्रसिद्ध केल्यास त्याचा इन्कार करूं असेंहि सांगितलें. आम्ही न कळवितांच अनेक वृत्तपत्रांतून हें वृत्त प्रसिद्ध झालें. मात्र आम्ही कळविल्यामुळेंच केसरीनें मिरज दरबारनें केलेल्या या अन्यायासंबंधीं लिहिलेलें स्फुट काढून टाकलें! सांगली, मिरज व पुणें येथील श्री. गणपतराव गोडबोले वकील, श्री. सदाशीवराव फडके वकील, श्री. विष्णुपंत वेलणकर, श्री. काशिनाथपत लिमये, श्री. पंडितराव दांडेकर, श्री. दा. मो. भट, वैद्य धुंडिराज पटवर्धन व डॉक्टर गोपाळराव पळसुले प्रभृति हिंदुत्वनिष्ठ मंडळींनीं मे. दिवाणसाहेबांच्या या अन्याय्य ताकिदीचे निषेधार्थ भेटी घेतल्या; तसेंच मिरज दरबार, मे. रेसिडेन्टसाहेब कोल्हापूर व मे. गव्हर्नरसाहेब मुंबई अशा तीन्ही ठिकाणाकडे सुमारें चाळीस गावचे अर्ज अन्याय्य ताकिदीच्या निषेधाकरितां येऊन धडकले. या कामीं प्रांतिक हिंदुसभा पुणें, विजापूर, कोपरगांव, जमखंडी, उगारखुर्द, पाचोरा, वणी, वादे, वाद्रे, बडोदें, जळगाव, विलेपार्लें, हुबळी, नाशीक, सोलापूर, तासगांव, कराड, वाई, एलिचपूर, रायपूर, इंदोर, उमरावती, अकोला इत्यादि ठिकाणच्या हिंदुसभांनीं व हिंदुत्वनिष्ठांनीं मंडळींनीं फारच परिश्रम केले. त्यामुळेंच ही अन्याय्य ताकीद सहा महिन्यांनें मागें घेतली गेली.

वरील सर्व परिस्थितीमध्ये अनेक सद्गृहस्थांचेकडून सहानुभूतीचीं व धीर देणारीं पत्रें आलीं. दोघां हिंदुत्वनिष्ठांनीं स्वसंरक्षक नेमण्याकरितां, अन्यायबंदी उठविण्याकरितां साह्य म्हणून पन्नास-पन्नास रुपये पाठविले. ' मिरजेंत राहातो कशाला, इकडे या ' अशींहि पत्रें डॉ. पळसुले पुणें, श्री. चितळे मुंबई, श्री. भाऊसाहेब चिपळूणकर अकोला यांचेकडून आलीं. सांगली येथील श्रीगजानन मिल्सचे मालक श्री. दादासाहेब वेलणकर हे स्वतःचें वाहन घेऊन न्यायवासच आले म्हणून कांहीं दिवस त्यांच्या आश्रयास व सहवासास राहाण्याचा सुयोग लाभला.

वरील सहा महिन्याच्या परिस्थितींत एका महत्त्वाच्या कामा निमित्त मे रेसिडेंटसाहेब कोल्हापूर यांचेकडे रीतसर पाठविण्याकरिता एक अर्ज मे दिवाणसाहेब यांचे सेक्रेटरींकडे योग्य तऱ्हेनें दिला असतां त्यांनी तो स्वीकारण्याचें नाकारलें व तुम्हीं तो अर्ज परभारें पाठवा असें सांगितलें. म्हणून दि ५ १२ ४० रोजी तोच अर्ज मिरज पोस्टातून रजिस्टर करून मे दिवाणसाहेब मिरज यांचेकडे पुन्हा पाठविल्यावर तो पुढें गेला !!

आभार –श्री. परमहंस परिव्राजक गुरुवर्य केवलानंद स्वामीमहाराज यांनीं हा महत्त्वाचा ग्रंथ म्हणून प्रथम वेळात वेळ काढून हस्तलिखित वाचून पाहिलें, नंतर मुद्रितहि पाहून शोध सुचविले व शेवटीं पुरस्कारहि लिहून पाठविला या त्यांच्या उपकाराचें उतराई होणें फार कठीण आहे. श्रीस्वामीजींनीं आपल्या पुरस्काराच्या शेवटीं ग्रंथातील विचाराचा प्रचार झाला पाहिजे अशी इच्छा दर्शविली आहे त्यांचे उपकारातून मुक्त होण्याचा हा मार्गच त्यांनीं सुचविला असल्यामुळें प्रचारकार्याच्या रूपानेंच त्यांचे उतराई होण्याचें आम्हीं ठरविलें आहे

सोलापुरास शके १८६१ मध्यें प्रवचनार्थ गेलों असता ज्यांच्या प्रोत्साहनामुळें हा ग्रंथ लिहिण्याचें योजल व त्यांच्या शब्दाला मान देऊन श्रीमंत नानासाहेब साठे यांनीं पांचशे रुपयांची देणगी देण्याचें आश्वासन देऊन तें कृतींत आणलें, असे आमचे फार दिवसाचे हिंदुत्वनिष्ठ मित्र श्री अमृतरावपंत रेंगुर्णीकर साहेब यांस प्रथम आभार मानतों. श्रीमंत चि. भि तथा नानासाहेब साठे चन्नाटदार यांनीं पूर्व परिचय ( साक्षात् ) नसताना कार्याचें महत्त्व जाणून या प्रयास प्रथम उदारपणानें पांचशें रुपयांची देणगी दिली म्हणूनच हा ग्रंथ पुढे आला असें येथे कृतज्ञतापूर्वक नमूद करितों

ग्रंथलेखन चालू असता ज्या अकल्पित घटना घडल्या, त्या परिस्थितींत ज्यांनीं पत्रें पाठवून, समक्ष भेटून, सरक्षणास साह्य करून, अन्याय्य ताकिदीच्या निषेधार्थ अर्ज पाठवून जें जें यथाशक्ति साह्य केलें, त्याबद्दल या सर्वांचें व मिरज दरबारनेंहि काहीं दिवसपर्यंत पोलीस सरंक्षण देऊन कर्तव्यदक्षता दाखविली म्हणून मिरज दरबारचेहि आम्ही आभारी आहों.

अशा महत्त्वाच्या ग्रंथांत शक्य तेवढी अपूर्णता राहू नये व संपूर्ण

हिंदुसमाजाचें निरीक्षण व्हावें म्हणून आम्ही मलबार, मद्रास, सिंध, राजपुताना, बंगाल वगैरे प्रांतांत समाजनिरीक्षणार्थ प्रवास केला. हिंदु समाजाची माहिती मिळवून देण्याचे कामीं ज्यांनीं आदरातिथ्यपूर्वक साह्य केलें त्यांत श्रीमत सदाशिवराव गोरे-कोचीन, श्री. वासुदेवराव गोरे व श्री गोविंदराव गुर्जर-कालिकत, डॉ. हरिदास व श्री गोविंद व्यंकटेश पै-मंगलोर, डॉ. निमकरसाहेब, श्री दांडेकरसाहेब, श्री. पु. दि. जोशी साहेब, श्री मार्कंडेय ब्रह्मचारी-मद्रास, श्री रामभाऊ शिंदे, श्री हर्डीकर, प्रा. कर्डिलेसाहेब-कराची, प्रि. भोपटकरसाहेब-सक्कर, श्री. एस्. आर. भिसे-हैद्राबाद (सिंध), श्री. कुमोरसाहेब, श्री फाटक, श्री. वाडेकर-जोधपूर, श्री. खाडेकर, श्री दामलेसाहेब-अजमीर, श्री. तात्यासाहेब भट, श्री. मामा वितळे-कलकत्ता, प्रा. सुनरकरसाहेब डाका इत्यादींचा उल्लेख केल्यावाचून आमच्यानें राहवत नाहीं.

निरनिराळ्या ठिकठिकाणीं प्रस्तुत ग्रंथात केलेला आहे अनेक विद्वान ग्रंथकारांचें ऋण या ग्रंथाला लाभलेलें आहे त्या सर्वांचे आम्ही कृतज्ञतापूर्वक आभार मानतों अनेक विद्यमान ग्रंथकारांची संमति आम्हांस मिळविता आली नाहीं, म्हणून त्यांनीं क्षमा करावी अशी विनति आहे

ज्या विद्वान व विचारी हिंदुत्वनिष्ठ स्त्रीपुरुषांनीं आमच्या प्रश्नपत्रिकेला सविस्तर उत्तरें पाठविलीं, त्यांचेहि आम्ही धर्मासंबंधींच्या कळकळीबद्दल अत्यंत आभारी आहों विचारवंताकडून आलेल्या उत्तरांचें सार त्यांच्या त्यांच्या नांवावर ग्रंथाचे शेवटीं परिशिष्टात दिलेलें आहे

आमचे कलावंत मित्र श्री शंकरराव किर्लोस्कर यांनीं सुंदर, सुबक असा ब्लॉक विनामूल्य करून देऊन ग्रंथाच्या उठावदारपणात भर घातली म्हणून त्यांचें नि हिंदुसमाजोद्धारक वाङ्मयमालेचीं पुस्तकें छापविणें कामीं ठिकठिकाणच अनेक सद्गृहस्थ निर्व्याज प्रेमानें साह्य करीत असतात त्या सर्वांचे आम्ही आभारी आहों

कोल्हापूर येथील श्रीज्ञानेश्वर प्रेसचे व्यवस्थापक व मालक श्री सहस्रबुद्धे यांनीं या पुस्तकाचें सर्व काम फारच दक्षतेनें आणि गोड शब्दानें व्यवस्थितपणें केलें, तसेंच ग्रंथलेखनाचे कामीं श्री रा वि आपटे यांनींहि चारसहा महिने निरलसपणें वाटेल तेव्हां येऊन साह्य केलें म्हणून हे उभयता स्तुतीस पात्र आहेत

शेवटीं ज्या जगन्नियामक शक्तीच्या कृपेनें अनेकांचें साह्य मिळून हें अल्पकार्य पार पडलें व ज्याच्या कृपेमुळेंच गेलीं पधरा वर्षें हिंदुधर्म व हिंदुसमाज सुधारणेचें कार्य आमचेकडून अव्याहत चालू आहे, त्या ईश शक्तीचें अनन्यभावानें स्मरण करून आणि या पुढचें संकल्पित कार्य तोच दयानिधि सिद्धीस नेवो, अशी त्याची प्रार्थना करून हें प्रास्ताविक निवेदन पुरें करतों

मिरज
पौष शुद्ध पूर्णिमा
शके १८६३
२।१।४२

हिंदुसमाजसेवक
महादेवशास्त्री दिवेकर.

श्री. परमहंस परिव्राजक

## श्री केवलानंद स्वामी महाराज-वाई

# यांचा पुरस्कार

एवढा महावृक्ष, भगवंतानें 'अश्वत्थः सर्व वृक्षाणा' अशा आशा पत्रानें ज्याला आपलें विभूतिपद दिलें, त्या पिंपळाचीं देखील पानें सर्वच्या सर्व प्रतिवर्षी गळून पडतात आणि तो वृक्ष पुनः नवकोमलपल्लवांनीं संपन्न होऊन वाढीला लागतो. संसारवृक्षाची देखील परिस्थिति अशीच आहे. मानवसमाजाचे नानाविध व्यापार पाहिले तरीसुद्धा हाच न्याय दिसून येतो. प्रधान म्हणून गणली जाणारी समाजवृक्षाची जी धर्मशाखा तिचें जीवन देखील याच पद्धतीनें चालू असतें. 'वृक्षश्चलन् सह शाखाभिश्चलति' हें न्याय्यच आहे. धर्म अपरिवर्तनीय आहे असें आजपर्यंत पुष्कळ शिष्टजन सांगत आले आहेत; परंतु ग्रंथाकडे आणि अनुष्ठानाकडे उघड्या डोळ्यांनीं पाहिलें म्हणजे परिवर्तन (बदल) सर्वत्र दिसतें. आश्वलायनकल्प, सांख्यायन-कल्प; बौधायनकल्प, आपस्तम्बकल्प, सत्याषाढकल्प, कात्यायनकल्प या सर्व कृति भिन्नमताच्या आणि परिवर्तितच आहेत. अलीकडील म्हणजे हजार पाचशें वर्षांतील शेंकडो पंथ नि संप्रदाय हे काय अपरिवर्तनच दर्शवितात? समाजाच्या सर्व व्यापारक्षेत्रामध्यें अशीं परिवर्तनें होत राहाणें वस्तुतः अपरिहार्यच आहे; इतकेंच नव्हे तर त्यामुळेंच समाजात जिवंतपणा राहातो. सर्वांशीं परिवर्तन थांबलें की मृत्यूच तो!

पदपदार्थाचे संबंध ज्याला सामान्यतः कळले आहेत त्यानें उच्चार-लेला किंवा ऐकलेला 'धर्म' हा शब्द कोणत्या अर्थाचें प्रतिपादन करतो, हें पाहिलें तर 'स्वर्गसाधनीभूत, प्रत्यक्षानुमानांनीं ज्याचा साधनभाव सर्वथा अगम्य आहे, अशीं श्रुति-स्मृतिपुराणोक्त अनुष्ठेयाचीं कर्में' असा अर्थ तो शब्द प्रतिपादितो. मात्र त्याबरोबर दुसरा एक धर्म शब्दाचा अर्थ घेतला जातो. 'स्वर्गाच्या इच्छेनें न करतां ईश्वरार्पण बुद्धीनें किंवा कर्तव्यताबुद्धीनें केलेलीं पूर्वोक्त कर्में' असा तो दुसरा अर्थ

आहे पहिला अर्थ पूर्वमीमांसा संप्रदायाचा आहे आणि दुसरा अर्थ उत्तरमीमांसा संप्रदायाचा म्हणजे अध्यात्मवादाचा आहे मात्र हा भेद जुन्या सुशिक्षित समाजामध्येंहि स्पष्टपणें जाणिवेंत नाहीं विचाराचा फारच गोंधळ झालेला आहे वट–अश्वत्थादिकांच्या पूजेपासून तों ब्रह्मोपासनेपर्यंत सर्वच 'वैदिकधर्म' म्हणून मोठमोठ्या विद्वानांनीं प्रथारूढ करून ठेवला आहे

'माझें बरें व्हावें, अनिष्ट होऊं नये' अशा इच्छेनेंच मनुष्य धर्माचें अनुष्ठान करीत असतो धर्मानुष्ठानानें विशेषत स्वर्ग मिळतो स्वर्ग म्हणजे सुख हें स्वर्गसुख प्राय अन्यजन्मात मिळावयाचें मग तें अन्यजन्म या भूलोकीं येईल किंवा भुवर्लोक स्वर्लोक इत्यादि लोकामध्यें येईल स्वर्लोकात जन्म येणें फार चांगलें उत्तरमीमांसेप्रमाणें सत्यलोकात जन्म येणें फार चांगलें वस्तुत चालू जन्माची किंबहुना या भूलोकाची काळजी वाहण्यात विनाकारण बुद्धि आणि श्रम न वेंचता उत्तरजन्माची आणि परलोकाची स्वत पुरती काळजी वाहण्यांत म्हणजे धर्मानुष्ठानात ते वेंचावे असें करणारा मनुष्यच धर्मनिष्ठ होय धर्मराज हा श्रेष्ठ, भीमार्जुन हे भीम–अर्जुन असल तरी ते आज्ञाधारक आजपर्यंत सर्व समाजाची याप्रमाणें समजूत होती आणि म्हणूनच इहलोकाकडे पाहण्याची दृष्टीच हळू हळू नष्ट झाली इहदृष्टीच्या नाशामुळें तत्त्वज्ञानोपयोगी असून व्यवहारोपयोगी अशीं अनेक विज्ञानें भारतीयामध्यें उत्पन्न झालीं असूनही न वाटता खुटलीं ऐहिक–सुखवाद, पारलौकिक–सुखवाद, इहपर–सुखवाद आणि पारमार्थिक–सुखवाद असे वाद उत्पन्न झाले ऐहिकसुखवादी चार्वाक नास्तिकाग्रणी ठरले पारमार्थिकसुखवादी सन्यासी, गोसावी, वैरागी झाले पारलौकिकसुखवादी ऋषि व विप्र श्रोत्रिय होते झाले, आणि गृहस्थ क्षत्रियवैश्य हे उभयसुखवादी होत शूद्र आणि अस्पृश्य याना या विचाराच्या कामात किंमत मुळींच नाहीं हें सांगायला नको

कोणताहि वाद, पथ, संप्रदाय, चिरजीवी नसतो, कारण तो काहीं काळानें समाजाची अधिक उन्नति करण्यास असमर्थ होतो येथे मीमासावादी असें म्हणेल कीं, धर्म हा नेहमीं समर्थच आहे मूलपणानें,

नास्तिकपणानें समाजाला तो धर्म अपुरा वाटू लागतो इतकेंच, पण यावर प्रश्न येईल कीं, मूर्खपणा नि नास्तिकपणा तरी का उत्पन्न झाला ? कांहीं असो, पण एवढें खरें कीं पुष्कळ विचारकानादेखील असें वाटतें कीं, पूर्वीच्या धर्मकल्पनामध्यें नवसमाजाचें धारण, पोषण आणि उन्नति कर ण्याचें सामर्थ्य उरलें नाहीं. अशा वेळींच नवयुगधर्माचा उदय होतो पूर्वीच्या धर्माच्या भूमिकेमध्यें, कल्पनामध्यें आणि, अनुष्ठानाच्या रीती- मध्येंहि आमूलाग्र परिवर्तन केल्याबाचून धर्माला धारकता, पोषकता आणि उन्नतिकारकता येणार नाहीं

श्री. दिवेकरशास्त्री याचा नवा हिंदुधर्म याचकरता पुढें येत आहे. जवळच्या भविष्यकाळात तरी हिंदुसमाजाचें धारण, पोषण आणि उन्नति धर्माच्या बाजूनें कशी करता येईल हें सागण्याकरिता श्री. महादेवशास्त्री दिवेकरानीं नवा हिंदुधर्म प्रतिपादिला आहे यातील विचार सर्वांनाच पूर्णपणें मान्य होतील असें नसलें तरी पुष्कळ विचारकाकडून या एकदर विचारसरणीस मान्यता मिळेल असें निश्चित वाटतें.

श्री दिवेकरशास्त्री यानीं बहुत प्रवास, निरीक्षण, परिश्रम करून आजपर्यंत केलेल्या विचाराचा आणि कार्याचा आढावा घेऊन विस्तृत रीतीनें तो सर्व आढावा 'नवा हिंदुधर्म' या ग्रथरूपानें हिंदुसमाजापुढें ठेवला आहे, हें मोठें स्तुत्य कार्य त्यानीं केलें आहे यात सशय नाहीं. या ग्रथात प्रतिपादिलेले विचार जर समाजानें पचविले आणि आचारात आणले तर उद्धाराचा मार्ग चागलाच चोखळला जाईल अशी आशा आहे. हे विचार समाजात लौकर पसरले पाहिजेत. त्याकरता प्रचारहि व्हायला पाहिजे

कार्तिक कृष्ण ६ शके १८६३

स्वामी केवलानद.

---

## पट्टग्राम व करवीर पीठस्थ

# श्रीमद् क्षात्रजगद्गुरु यांचा शुभाशीर्वाद

'प्रज्वालितो ज्ञानमय प्रदीप.' २०।१२।४१

हिंदुत्वदीपक श्री. महादेवशास्त्री दिवेकर यानीं 'नवा हिंदुधर्म' हा ग्रंथ लिहून हिंदुसमाजाला जोराची चालना दिलेली आहे. या ग्रंथातील पुष्कळ विचार सनातनी दृष्टीनें पाहिल्यास खरोखरच क्रान्तिकारक आहेत. अखिल हिंदूना वेदाधिकार, उपनयनादि संस्काराचा अधिकार आणि हिंदूतील जो तज्ञ व आचारसपन्न असेल त्याला पौरोहित्याचाहि अधिकार आहे, असें या ग्रंथात घोषित केलें आहे. हिंदुसमाजाची कीड जी जन्म जात उचनीचता व अस्पृश्यता ती नष्ट करण्याचे उपाय या ग्रंथात सांगि. तलेले असून याच जन्मीं प्रत्येक मनुष्याचा गुणानें व कर्मानें सर्वोत्कर्ष होऊ शकतो अशी क्रान्तिकारक विचारसरणी या ग्रंथात अनेक प्रमाणें देऊन मांडली आहे.

प. दिवेकर याच्या या विचार समुच्चयास महाराष्ट्रातील विद्वानाचा पाठिंबा आहे, हें स्पष्ट दिसावें म्हणून त्यानीं जागजागीं धर्मनिर्णयमंडळाचे निर्णय उध्दृत केले आहेत. आजच्या या कालात सत्ता, संपदा व संस्कृति याचीं द्वारें समाजातील प्रत्येक घटकाला मोकळीं असलींच पाहिजेत व ती तशीं मोकळीं करून देणेंकरिताच धर्माचा अवतार आहे. 'नवा हिंदुधर्म' यासारखे बहुमोल ग्रंथ लिहून धर्माच्या या खऱ्या कार्यास प दिवेकरशास्त्री व धर्मनिर्णय मंडळ हातभार लावीत आहेत हें पाहून आम्हास फार संतोष वाटतो, म्हणून आम्ही या कार्याचा व नव्या हिंदुधर्मातील विचारसरणीचा उत्तरोत्तर उत्कर्ष व्हावा असा आशीर्वाद देतो इति शम् ।

---

महा-महोपाध्याय पांडुरंग वामन काणे
एम्. ए. एल्एल्. एम्. ॲडव्होकेट, मुंबई
ता. १४।१२।१९४१

## याचा अभिप्राय

आपल्या लौकरच प्रसिद्ध होणाऱ्या 'नवा हिंदुधर्म' या पुस्तकाचे अगाऊ छापून झालेले फॉर्म जरा घाईनें का होईना पण वाचून पाहिले. आपण हा ग्रंथ लिहून आपल्या धर्माची व समाजाची मोठी सेवा केली आहे. आपलें अन्तःकरण हिन्दुसमाजाची आजची विसकटलेली व नेभळट स्थिति पाहून तिळतिळ तुटत आहे हे आपल्या या पुस्तकावरून स्पष्ट होत आहे. कोणकोणत्या बाबतींत काय फरक आणि सुधारणा व्हावयाला पाहिजेत, याचें आपण साधार विवेचन केलें आहे. आपलें हें चाळीस प्रकरणाचे पुस्तक प्रत्येक हिंदु म्हणविणाऱ्यानें अवश्य वाचावें. आपल्या अडतिसाव्या प्रकरणात जी 'नव हिंदुधर्म सूत्रावली' दिली आहे, ती अत्यंत बोधप्रद व विचारणीय आहे. आपण जागोजाग अवतरणें सार्थ दिल्या-मुळें वाचकाची सोय झाली आहे. धर्मनिर्णय मंडळाचे प्रमुख निर्णय आपण मान्य करून त्याचा प्रचार आपल्या या ग्रंथात केला आहे, हें अभिनन्दनीय आहे. मराठींतील धर्मशास्त्रविषयक वाङ्मयात आपल्या ग्रंथानें चांगली भर पडली आहे.

---

## रावबहादूर इतिहासकार गो. स. सरदेसाई यांचा अभिप्राय.

कामशेत ता. १ डिसेंबर १९४१

" नवा हिंदुधर्म " हें विचारप्रवर्तक पुस्तक चाळून पाहिलें. कांहीं प्रकरणें सर्व वाचलीं. आपलें पुस्तक म्हणजे एक साद्यंत व साधार इतिहासच बनला आहे. अशा योग्यतेचें दुसरें पुस्तक माझ्या पाहाण्यांत नाहीं. वेदकालापासून धर्मसिंधूच्या कालापर्यंत जे स्मृत्यादि महान् ग्रंथ तसेंच महाभारत रामायण पुराणें इत्यादि ऐतिहासिक ग्रंथ व भगवद्गीतेसारखे तात्त्विक ग्रंथ या विस्तृत भरतभूमींत निर्माण झाले, त्यांतील वेंचे व उतारे ठिकठिकाणीं दिल्यामुळें वाचकांस आपला धर्म खरोखर काय आहे, हें समजून घेण्याची सोय आपल्या या पुस्तकानें चांगली होईल.

हिंदुधर्माचें पूर्वस्वरूप, त्याचीं वेळोवेळीं झालेलीं रूपान्तरें, आणि प्रस्तुतच्या जागतिक परिस्थितींत आपल्या राष्ट्रास अवश्य असलेले निकडीचे फेरफार या सर्व गोष्टी आपण या पुस्तकांत स्पष्ट व साधार मांडल्या आहेत. हल्लीं भूतलावर ज्या प्रचंड घडामोडी होत आहेत, त्यांचा संपर्क हिंदी राष्ट्रास पोंचल्याशिवाय राहणार नाहीं, म्हणून भविष्यकाळीं आपणास जगावयाचें असेल तर धर्मार्थकाममोक्ष या सर्व गोष्टी साधण्याकरितां आज काय करणें जरूर व शक्य आहे त्याची सूत्ररूपी संपूर्ण यादी उपसंहारांत दिली आहे, तेवढ्यावरूनच प्रत्येक वाचकास पुस्तकांतील विवेचनाची खात्री पटेल.

धर्मनिर्णयपरिषद स्थापण्यांत आली असून त्या संस्थेमार्फत जी चर्चा मुमुक्षु विद्वानांकडून होत आहे, तिचा अन्तर्भाव या पुस्तकांत फार चांगला करण्यांत आला आहे. शेवटच्या प्रकरणांत हिंदुराष्ट्राच्या संघटनेचा विचार केला आहे तो आजच्या स्थितीस अत्यंत उपयुक्त आहे. पुस्तक सहज चाळलें तरी आपलें विस्तृत वाचन व प्रचंड परिश्रम यांची कल्पना होते. आपल्या या उद्योगाच्या द्वारा या पतितराष्ट्राचा भाग्योदय लवकर होवो, एवढीच ईशचरणीं माझी प्रार्थना आहे.

---

# आधारभूत ठळक ग्रंथांची यादि

(१) ऋग्वेद, यजुर्वेद, अथर्ववेद.
(२) दशोपनिषदें.
(३) षड्दर्शनाचे सूत्रग्रथ.
(४) धर्मसूत्रें, गृह्यसूत्रें, स्मृतिग्रथ.
(५) महाभारत.
(६) रामायण
(७) वायुपुराण.
(८) मत्स्यपुराण.
(९) कूर्मपुराण.
(१०) भविष्यपुराण.
(११) भागवत
(१२) ब्रह्मसूत्रभाष्य.
(१३) गीता.
(१४) ज्ञानेश्वरादि साधुसंताचे ग्रथ.
(१५) अनेक धर्मनिबंधकाराचे निबंध ग्रथ.
(१६) ज्ञानकोश.
(१७) धर्मकोश.
(१८) महाभारताचा उपसंहार.
(१९) रामायणाचा उपसंहार.
(२०) गीतारहस्य.
(२१) इतिहासाचार्य राजवाडे याचे अनेक ग्रथ.
(२२) मध्ययुगीन भारत भाग १।२।३ —चिं. वि. वैद्य
(२३) भारतीय तत्त्वज्ञान.—न. चिं. केळकर
(२४) राष्ट्रमीमासा व धर्म हवा कशाला ?—ग. दा. सावरकर
(२५) सावरकर साहित्य भाग १।२।३।४।५.
(२६) विज्ञानप्रणीत समाजरचना—डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे.
(२७) अस्पृश्याचा प्रश्न— प्रा. श्री. म. माटे.

(२८) हिंदुधर्म विश्वधर्म — जानोटकर
(२९) हिंदुधर्मदीपिका — ऋग्वेदी
(३०) धर्मनिर्णयमंडळाचे निर्णय.
(३१) धर्मरहस्य
(३२) तात्त्विक मीमांसापद्धति
(३३) धर्मविवादस्वरूप
— विद्वद्रत्न दप्तरी
(३४) शुद्धिसर्वस्व
(३५) आनंदमीमांसा
— तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी
(३६) धर्मस्वरूप निर्णय
(३७) नवा आचारधर्म
— तर्कतीर्थ कोकजशास्त्री
(३८) अस्पृश्यतेचा शास्त्रार्थ — महामहोपाध्याय श्रीधरशास्त्री पाठक.
(३९) धर्मशास्त्रविचार – महामहोपाध्याय पा. वा. काणे
(४०) आर्यांचे संस्कार – श्रौताचार्य धुंडिराजदीक्षित बापट.
(४१) हिंदुसमाज समर्थ कसा होईल ?
(४२) धर्मशास्त्रमंथन
(४३) आर्यसंस्कृतीचा उत्कर्षापकर्ष–पूर्वार्ध
(४४) गीताप्रदीप
(४५) गोवर्धन ब्राह्मणाचा इतिहास
— महादेवशास्त्री दिवेकर

## आधारभूत इंग्रजी ग्रंथांची यादी

1 The Origin and Development of the moral ideas Vol 1–2
2 The History of Human Marriage Vol 1-2-3.
3 Early Civilization
4 The Principles of Sociology
5 Methods of Social Reform
6 Primitive Society
7 The Elements of Social justice
8 Outlines of Sociology.
9 The History of Caste in India
10 Man and His work
11 Marriage and Morals

# शुद्धिपत्र

[ फॉर्म ठोकताना खिळे हलल्यामुळें काने, मात्रा व वेलांट्या यांचीं अशुद्धें वरींच पडलीं आहेत. तीं सहज समजण्याजोगीं असल्यामुळें येथें फक्त महत्त्वाच्या अशुद्धांचें शुद्धिपत्र दिलें आहे. ]

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १७ | १ | जोगें | होण्याजोगें |
| २७ | १४ | वगैरेर्ची | वगैरेंची |
| ३२ | २६ | लोकवक्तिः | लोकपक्तिः |
| ४४ | २७ | रोगी | रोगी, |
| ४५ | २६ | व्याधित् | व्याधित |
| ४८ | ११ | क्षण | क्षण हा। |
| ५४ | ७ | व्यवस्थापूवर्क | व्यवस्थापूर्वक |
| ८० | २ | महराष्ट्रिय | महाराष्ट्रिय |
| १०६ | ५ | नत्सुधानमृते | नत्सुधानमृते |
| १०६ | २८ | दर्तदैतान् | दतेदैतान् |
| ११५ | २७ | प्रणय. | प्रणय. |
| १३३ | २९ | फादींरेश | फादींरेशा |
| १४७ | २० | अद्रोह | अद्रोह |
| १६९ | १३ | चामड्याचा | चामड्याचा व |
| १७७ | २१ | ग्रामफक्कुट | ग्रामकुक्कुट |
| १८० | ७ | चान्य शाक | चान्यशाक |
| १८० | १३ | सौवीर सौराष्ट्र | सौवीरसौराष्ट्र |
| १८० | १४ | फलिंग कींकणान् | फलिंगकींकणान् |
| १८२ | ३ | सांगतो. अंसें | असें सांगतो |
| १८३ | ६ | यजेत् | याजयेत |
| १८४ | ६ | द्रमणांचकार | द्रमणांचकार |
| १८५ | १७ | स्यात | स्यात् |
| १८६ | १५ | देतें | येतें |
| १८९ | १५ | गीन | गीन् |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १९१ | ७ | माघनिर्वृत्त | माघनिवृत्त |
| १९१ | १० | उपनिषपदामध्यें | उपनिषदामध्यें |
| १९७ | २३ | धर्मशास्त्रान | धर्मशास्त्रानें |
| २१९ | १ | आवधालयें | औषधालयें |
| २२२ | २२ | जोमुख्य | जो मुख्य |
| २२७ | १ | विवाहा | विवाह— |
| २२७ | १४ | व्यक्तीच | व्यक्तीचा |
| २३० | २८ | गारव | गौरव |
| २३९ | १० | भोजनस मारम | भोजन समारंभ |
| २४४ | २४ | एकत्वानचें | एकत्वानेंच |
| २५१ | १ | ग्रह्यसूत्रांत | गृह्यसूत्रांत |
| २५६ | १५ | आदर्शनामुळें | अदर्शनामुळें |
| २७७ | २६ | प्रजाननाची | प्रजननाची |
| २९५ | ७ | व-ध्याऽर्धघ्न्या | वन्ध्याऽर्धघ्न्यप्रियवदा |
| ३०९ | १३ | मातिकशास्त्र | भौतिकशास्त्र– |
| ३१० | २३ | त्याच्य | त्याच्या |
| ३२९ | ३ | मोठ्य | मोठ्या |
| ३३६ | २१ | अभिरुचिप्रमाणें | अभिरुचीप्रमाणें |
| ३७० | १५ | कार्यामिदीर्ति | कायामिदीर्ति |
| ३९२ | ८ | हिंसा नाहीं | अहिंसा नाहीं. |
| ४०५ | शीर्षक | हिंदुधमाचें | हिंदुधर्माचें |
| ४२३ | २९ | कर्तृत्वान् | कर्तृत्ववान् |
| ४२५ | ११ | हिंदीमध्ये | हिंदीमध्यें |
| ४४५ | १० | जवजळीत | जळजळीत |
| ४९० | २३ | वचनाप्रवृत्ति. | वचनात्प्रवृत्ति |
| ४९४ | ९ | ना. | वा. |
| ४९५ | १९ | स्नेहवर्धनदिन | स्नेहवर्धनदिन |

—०—

# नवा हिंदुधर्म

## भाग पहिला

## प्रमाणविचार

### प्रकरण पहिलें

### नव्या हिंदुधर्माची आवश्यकता

(१) **हिंदुधर्माचें जगावर ऋण** –हिंदुधर्म हा सर्व जगातील विद्यमान धर्मांत अत्यंत प्राचीन असा धर्म आहे. हिंदुस्थानांत उत्पन्न झालेले हिंदुधर्म, जैनधर्म, बौद्धधर्म, शीखधर्म असे चार धर्म आहेत. चीन–जपानमध्यें कॉन्फ्यूशिअनधर्म, टाओधर्म, शिंटोधर्म हे धर्म असून, पॅलेस्टाइन, इराण व अरबस्तानामध्यें यहुदीधर्म, पारशीधर्म, मुसल्मानधर्म व खिस्तीधर्म असे चार धर्म आहेत या सर्व धर्मांना हिंदुधर्मानें ऋण दिलेलें आहे. हिंदुधर्माचे संस्कार जैन व बौद्ध धर्मांवर झालेले आहेत बौद्धधर्माची छाप खिस्तीधर्मावर, खिस्तीधर्माची छाप मुसल्मानधर्मावर पडलेली असून साक्षात् वा परंपरेनें हिंदुधर्माचीं तत्त्वें इतर धर्मांनीं स्वीकारलीं आहेत.

(२) **अधोदेश** –एक काल असा दिसतो कीं हिंदुधर्म, हिंदुराष्ट्र, हिंदु संस्कृति हीं परमोच्च पदावर होतीं ! सर्व जग या राष्ट्राकडे आदरानें पहात होतें ! नाना देशाचे विद्वान या राष्ट्राकडे येऊन येथील विद्या ग्रहण करीत असत ! पण तो काल आता उलटला आहे ! धार्मिक,

सामाजिक, राजकीय अशा विविध कारणांनीं हिंदुसमाजाची व हिंदुराष्ट्राची अवनति झालेली आहे. हिंदुसमाजाची आणि हिंदुराष्ट्राची उन्नति करण्याकरिता अनेकद्वारांनीं निरनिराळे यत्न चाललेले आहेत. हिंदुसमाजाच्या आणि हिंदुराष्ट्राच्या अवनतीला धार्मिक नि सामाजिक दृष्ट्या जीं वैगुण्यें कारणीभूत झालेलीं आहेत, तीं समूळ नष्ट करण्याची दिशा दाखविण्याचा प्रस्तुत ग्रथाचा उद्देश आहे. कोणतीहि गोष्ट आकांक्षेशिवाय पुढें येत नाहीं. नव्या हिंदुधर्माची आकांक्षा आणि आवश्यकता का उत्पन्न झालेली आहे हें आता सागतों.

( ३ ) नवाकाल, नवाधर्मः—'नवी विटी, नवें राज्य,' या म्हणी प्रमाणें आजच्या नव्या कालाकरिता नवा हिंदुधर्म अवश्य आहे मनुष्य प्राण्यामध्यें पूर्वापेक्षा काहीं बदल झालेला नाहीं. त्याचीं ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, मन, बुद्धि, आत्मा, शरीर हीं सर्व जशींच्या तशीच आहेत. तथापि माणसाच्या कल्पना, भावना, विचार, ध्येयें, गरजा, पद्धति, शिष्टाचार इत्यादि मध्यें अतिशय परिवर्तन झालेलें आहे. प्राचीनकालचा मन्त्रकाल, मध्यकालचा तन्त्रकाल हे मागें पडून या यन्त्रकालात आपलें सर्व जीवन यन्त्रारूढ झालेलें आहे. भौतिक शास्त्रें व शोध यानीं जगात क्रांति केल्यामुळें सर्व जग पूर्वापेक्षा अगदीं जवळ जवळ आलें आहे.

( ४ ) परिवर्तनाची व्याप्ति –भौतिकशास्त्राच्या प्रगतीमुळें वेगवान् वाहनें अस्तित्वात आलीं त्यांनीं दळणवळण वाढविलें, ज्ञानाची देवघेव सुलभतेनें होऊं लागली, निरक्षरता झपाट्यानें कमी होऊं लागली, एकत्र कुटुंबपद्धति गेली, व्यवसायामध्यें संकर झाला, त्यामुळें अन्नव्यवहारादि निर्बंधांना शैथिल्य आलें. छापखाने, कारखाने, विमाकंपन्या, वृत्तपत्रें इत्यादि जीवनाला अवश्य अशीं नवीं साधनें निघालीं, त्यानींहि हिंदुसमाजामध्यें उलथापालथ करून टाकली ! भारतत्यामुळें हिंदुस्थानात नवेनवे कायदे होऊं लागले आणि एकदरींत परिस्थितीमध्यें फारच परिवर्तन झालें.

पुरुषाच्या पोषाखामध्यें, स्त्रियांच्या वेशभूषेमध्यें, केशरचनेमध्यें विलक्षण अंतर पडलें. जुन्या धर्मशास्त्राच्या मर्यादा ओलाडून आहार, व्यवसाय, शिवाशिवीच्या कल्पना, घराची बांधणी, कुटुंबाची राहाणी

यातहि क्रांति झालेली आहे. देवघरें, तीर्थें, क्षेत्रें, मठ, मंदिरें अशा सर्व ठिकाणीं नव्या युगातील विचार वेगानें घुसत आहेत नव्या युगातील विचारानें या सुधारणेनें अस्पृष्ट असें एकहि क्षेत्र राहिलेलें नाहीं, अशा वेळीं नव्या युगाला अनुसरून नवा हिंदुधर्म सांगण्याची अत्यंत आवश्यकता आहे.

(५) बुद्धोत्तरकालीन धर्म म्हणजेच जुना हिंदुधर्म.–प्राचीनकाळीं या भरतखंडात यज्ञप्रधान वैदिकधर्म होता. पुढें वर्णाश्रमयुक्त स्मार्तधर्म अस्तित्वात आला. तो प्रामुख्यानें नैवर्णिकातच होता बुद्धोत्तर कालात पुराणोक्त धर्म अस्तित्वात येऊन तो अखिल हिंदुसमाजामध्यें वावरू लागला आज हिंदुसमाजात रूढ असलेला हिंदुधर्म म्हणज बुद्धोत्तरकालीन तत्त्वांनीं व कल्पनांनीं मिश्रित असा बुद्धाळलेला धर्म होय। यालाच जुना हिंदुधर्म असें आम्ही म्हणतों बुद्धपूर्वकालीन वैदिकधर्मात आणि आर्यधर्मात जे उच्च, तेजस्वी, जयश्री व समाजधारणेला उपयुक्त असे विचार आहेत, त्यांचें पुनरुज्जीवन करणें म्हणजेच नव्या हिंदुधर्माचें प्रतिपादन होय

(६) अखिल हिंदूकरिता नवा हिंदुधर्म –समाज ज्या केंद्रा भोंवतीं भ्रमण करीत असतो, तीं म्हटलीं म्हणजे सत्ता, संपदा व संस्कृति हीं होत. या केंद्राची मिरासदारी या युगानें नष्ट केलेली आहे सत्ता ही केवळ क्षत्रियाकडे, संपदा ही वैश्याकडे आणि संस्कृतीचा मक्ता केवळ ब्राह्मणाकडे अशी विभागणी या नव्या कालाला असह्य आहे. प्रत्येक मनुष्याला सत्ता, संपदा व संस्कृति हीं अवश्य आहेत. शिक्षणामुळें या आकांक्षा आता प्रत्येकाच्या ठिकाणीं उत्पन्न झालेल्या आहेत. अमक्या गटानें अमुकच करावें व तमक्यानें अमुक करूच नये असले निर्बंध घालण्याचे दिवस आता गेले या नव्या युगामध्यें सर्वांना समता हवी आहे, म्हणून प्रत्येक मनुष्याला आपल्या उन्नतीकरिता समानसंधी मिळणें अवश्य आहे. मनुष्यत्व, मानव्याचा विकास हें आजच्या युगाचें ध्येय असल्यामुळें तें गांठण्याचा मार्ग सुलभ व्हावा म्हणून अखिल हिंदूकरितां सर्वांना सारखा असा नवा धर्म सांगण्याची आवश्यकता आज उत्पन्न झालेली आहे.

(७) शेवटचा निर्णय कोणाचा ?.–नव्या कालाला अनुरूप

असा-नवा हिंदुधर्म बुद्धपूर्वकालीन वैदिक आर्यांच्या तत्त्वज्ञानावर अधिष्ठित-धर्म सांगण्याचा अधिकार एका व्यक्तीपेक्षा संस्थेलाच आहे. आम्ही त्या धर्मनिर्णयमंडळाचे प्रस्थापक व घटक आहों, त्या मंडळाचेंच हें कार्य आहे मंडळाच्या कार्याला हा वैय्यक्तिक यत्न बराच साह्यभूत होणार आहे. ज्या ज्या व्यक्तींनीं हिंदुधर्म व समाज याचा अभ्यास व निरीक्षण निदान एकदोन तपें केलें आहे, त्या सर्वांना हिंदुसमाजाच्या अभ्युदयार्थ आपापले विचार सांगण्याचा जसा अधिकार आहे, तसाच तो प्रस्तुत लेखकालाहि आहे. पण शेवटच्या निर्णयाचा अधिकार धर्मनिर्णय मंडळाचा आहे

(८) नवा हिंदुधर्म कसा असावा ? –आज रूढ असलेल्या हिंदुधर्मांत बुद्धपूर्वकालीन व बुद्धोत्तरकालीन असे दोन विचारप्रवाह आहेत. बुद्धपूर्वकालीन तेजस्वी वैदिक आर्यधर्मामध्यें बुद्धोत्तरकालात अनेक दोष शिरले जगत् दु खमय आहे, तें क्षणभंगुर आहे, संसार असार आहे, व्यवहार मिथ्या आहे हें बुद्धोत्तरकालीन तत्त्वज्ञान घालविणारा आणि जगत् सत्य आहे, तें अनादि आहे, पुरुषार्थांकरिता जन्म आहे असें सांगणारा धर्म आज हवा आहे जुना हिंदुधर्म वर्णसंस्था आणि जन्मजात उच्चता, नीचता व अस्पृश्यता या त्रिदोषांनीं युक्त अशा जातिसंस्थेंतच गुरफटलेला आहे. वर्णसंस्था आज नाहीं, जातिसंस्थेचें काम संपलें, यापुढें अखंड एकजिनसी हिंदुजाति हें हिंदुसमाजाचें ध्येय असें सांगून त्याचा मार्ग दाखविणारा धर्म आज हवा आहे निवृत्तिपर वेदांताचें आणि चतुर्थाश्रमाचें बंड कमी करणारा, कर्तृत्ववान् गृहस्थाश्रमी माणसाचें महत्त्व पटविणारा, व स्त्रियाविषयींची अनुदारता नष्ट करणारा नवा धर्म आज हवा आहे. कलियुगाची तर्कदुष्ट कल्पना घालविणारा, दैववादाचा तिरस्कार करणारा, उद्योगवादाचें मंडण करणारा, अवताराच्या वेडांतून, जिज्ञासा मारणाऱ्या वेदांतांतून, प्रज्ञाहत करणाऱ्या कल्पनांतून हिंदु समाजाला बाहेर काढणारा असा नवा धर्म आज हवा आहे. जुन्या हिंदुधर्माची भिस्त वचनप्रामाण्यावर व अपौरुषेयत्वावर आहे त्यामुळेंच आजचे प्रश्न सुटू शकत नाहींत म्हणून बुद्धिप्रामाण्यावर अधिष्ठित असा नवा हिंदुधर्म हवा आहे सारासार विचारास प्रवृत्त करणारा, स्त्रीवर्गाची कुचंबणा थांबविणारा, विवाहसंस्थेंतील दोष नष्ट करणारा, स्त्रीपुरुष-संबंध

अधिक पवित्र व सुखावह होण्याचा मार्ग दाखविणारा, अस्पृश्यतेचें समूळ उच्चाटण करणारा, हिंदुसमाजांतील अस्वाभाविक वैषम्य आणि वैलक्षण्य नाहींसें करणारा असा नवा हिंदुधर्म हवा आहे. अनेक प्रकारचे तर्कदुष्ट निषेध, शिवाशीव, विटाळ, जन्मजात उचनीचता इत्यादि बुद्धोत्तरकालात शिरलेले दोष नष्ट करणारा आणि अखिल हिंदूंचा एक संस्कार, एक ग्रंथ, एक मंत्र, एक सामुदायिक प्रार्थना, एक समष्टिधर्म असें सांगणारा हिंदुराष्ट्रोत्कर्षक नि हिंदुसमाजबलवर्धक असा नवा हिंदुधर्म आता हवा आहे.

बुद्धोत्तरकालीन जुन्या हिंदुधर्मानें आजवर हिंदुत्व राखलें, हिंदुत्वाचा नंदादीप तेवत ठेवला, हिंदुसमाजाचें मानबिंदु रक्षिले, याबद्दल जुन्या हिंदुधर्माच्या प्रणेत्यांना विनम्र भावानें व आदरानें शतश प्रणाम्च केले पाहिजेत तसे प्रणाम करून आम्ही सांगतों कीं जुना हिंदुधर्म हा आता टाचका, तोकडा व आजच्या हिंदुसमाजाच्या गरजा भागविण्यास अपुरा असा झालेला आहे हिंदुसमाजाच्या आजच्या आकांक्षा जुना हिंदुधर्म पुऱ्या करू शकत नाहीं जुनीं घरें, जुना पोषाख, जुनीं औषधें ही जशीं आज अपुरीं पडतात, तसा जुना हिंदुधर्म नव्या हिंदुसमाजाच्या आकांक्षेला, अभ्युदयाला, उत्कर्षाला व पूर्णतेला अपुरा पडत आहे म्हणून हिंदुसमाजाला पूर्णता आणण्याकरिता नव्या हिंदुधर्माची आवश्यकता आहे.



## प्रकरण दुसरें

### । धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा ।

(९) दोन आक्षेपः—पहिल्या प्रकरणात नव्या हिंदुधर्माची आवश्यकता सांगितली. प्रस्तुत प्रकरणात धर्मावर येणाऱ्या दोन आक्षेपाचा परामर्श घेऊन धर्म हा अखिल विश्वाचा कसा आधार आहे, जगाच्या अतापर्यंत तो कसा टिकणारा आहे, याचें विवेचन करावयाचें आहे.

(१०) पहिल्या आक्षेपाचें स्वरूपः—धर्म हवा आहे, पण त्याचें क्षेत्र सुतक, सोयेर, संस्कार, सण, उत्सव, समारंभ, दानें, व्रतें, श्राद्ध, उत्तरक्रिया, उपासपारणें, भोजनदिशा, भोजनपात्र, ग्रासखंख्या, परान्नसेवन, रजस्वलाशब्दश्रवण, चातुर्मास्यातील नेमधर्म, पूजाअर्चा, मुहूर्तपत्रिका, विधवावपन व विवाह एवढ्या विषयापुरतेंच आहे, असें समजणारा एक पक्ष आहे. हा पक्ष असेंहि म्हणतो की वैद्यशास्त्र, आरोग्यशास्त्र, व्यवसायशास्त्र, अर्थशास्त्र हीं सर्व दण्डनीतिशास्त्रात अन्तर्भूत होऊं लागलेलीं आहेत. स्पर्शवदी, व्यवसायवदी, खानपानवदी या सर्व गोष्टी आता धर्माच्या कक्षेपलीकडे गेलेल्या आहेत, म्हणून धर्माचें क्षेत्र फारच संकुचित झालेलें आहे.

(११) आक्षेपाला उत्तरः—धर्मसिंधु व निर्णयसिंधुप्रणीत जो धर्माचार आणि हेमाद्रि व अन्य निबंधकारप्रणीत दानें, व्रतें व प्रायश्चित्तें एवढाच काय तो धर्म आहे, असा अलीकडील काळांत कांहीं लोकाचा समज आहे, पण तो बरोबर नाहीं. स्मृतिग्रंथात आचार, व्यवहार व प्रायश्चित्त असीं धर्माचीं तीन अंगें प्रामुख्यानें सांगितलीं असलीं तरी धर्माचें क्षेत्र त्याहीपलीकडे फार व्यापक आहे. जातिधर्म, कुटुंबधर्म, राजाप्रजाधर्म, पतिपत्निधर्म, मनुष्यधर्म, गुरुशिष्यधर्म, पितापुत्रधर्म अशा अनेक प्रयोगांवरून धर्माच्या व्यापकतेचा बोध होतो. न्यायदान, विद्यादान, औषधीदान-अर्थोत्पादन, विवादसंस्था, वारसा, दायविभाग इत्यादि मानवी जीवनाशीं संबद्ध असलेल्या सर्व विषयाचे नियम म्हणजे धर्म होय. यासाठीच हल्लीं

कायदा किंवा निर्बंध असें म्हणतात. समाजधारणेकरिता, राष्ट्रोत्कर्षाकरिता अवश्य असलेले सर्व नियम व निर्बंध म्हणजे धर्म होय.

आज भौतिकशास्त्राच्या वाढीमुळें आरोग्यशास्त्र, वैद्यशास्त्र, व्यवहार, दंडशास्त्र, नीतिशास्त्र, अर्थशास्त्र याची व्यापकता वाढत चालली आहे. या शास्त्राच्या वाढीचा उपयोग हिंदुराष्ट्रानें कसा करून घ्यावा, या जागतिक कलहांत हिंदुसमाजानें हिंदुराष्ट्र म्हणून जगण्यास कोणकोणतीं शास्त्रें कशीं आत्मसात केलीं पाहिजेत, या सर्व शास्त्रांचें मूळ प्रयोजन, उद्देश व पर्यवसान सांगण्याचें काम धर्माचेंच आहे –

धर्मशास्त्र जर एकादशीच्या फराळाच्या पदार्थांत, भोजनासनधींच्या मनचवळेपणात, शिवाशिवींत, विटाळांत, सुतकांत व सोयेरांत आणि विधवांच्या केशवपनातच गढून बसले तर हें सर्व मानवी जीवन कशाकरिता आहे, तें कोणीकडे चाललें आहे, विविध शास्त्राच्या प्रगतीच्या द्वारा काय काय उलाढाली होत आहेत, हे सर्व अभ्यासपूर्वक व निरीक्षणपूर्वक पाहून त्यांतील इष्ट भागाकडे प्रवृत्त करण्याचें काम कोणी करावयाचें ? धर्मशास्त्र विशारदांनीं हें कार्य न केलें तर मराठेशाहींतील सवयांच्या सुभ्यामुळें झालेल्या हानीचाच प्रसंग यावयाचा ! आहारशास्त्र स्वतंत्र झालें कीं तें म्हणणार " माणसानें अमुक व इतकें खावें " दंडनीतिशास्त्र स्वतंत्र झालें कीं तें म्हणणार " अशा गोष्टी घडल्या कीं, दंड करावा. " आरोग्यशास्त्र स्वतंत्र झालें कीं तें म्हणणार " माणसानीं आरोग्याचे अमुक नियम पाळले पाहिजेत. " पण हीं सर्व शास्त्रें परस्पर पोषक आहेत, तीं मानव्याच्या उन्नतीकरिता आहेत, त्याचा उपयोग हिंदुराष्ट्राच्या अभ्युदयाच्या दृष्टीनें करून घेतला पाहिजे, कोणत्याहि शास्त्रामुळें हिंदुराष्ट्राची आणि हिंदुसमाजाची अवनति जर होत असेल तर हें शास्त्र नसून तें मारक शास्त्र आहे, असें सांगणें हेंहि धर्माच्या क्षेत्रांत येतें पारतंत्र्य, सत्तेचा व संघटनेचा अभाव यामुळें धर्माचें क्षेत्र फार अल्पसें अवशिष्ट असलें तरी मूळचें त्याचें व्यापकत्व किती आहे, हें विसरता कामा नये

( १२ ) हिंदुधर्माचें ध्येय –कठोर कर्मठपणा, कठोर जातिबंधनें आणि शिवाशीव म्हणजे हिंदुधर्म ही कल्पना बुद्धोत्तरकालीन आहे. हिंदुधर्म ही एक उच्च संस्कृति आहे ती समुद्रासारखी गंभीर व आकाशा

सारखी व्यापक आहे. हिंदुधर्म हा विश्वधर्म होण्यास पात्र आहे. हिंदुधर्माची तत्त्वप्रणाली फार थोर आहे. ( प्रकरण ३७ पहा. ) जगात शांतता, समता व बंधुत्व उत्पन्न करण्याचें आणि भौतिक उन्नतीबरोबर अध्यात्मिक शांतीचा लाभ जगाला देण्याचें कार्य दैवी संपत्तीच्या प्रसारानें हिंदुधर्मालाच करावयाचे आहे. मनूचें मानवधर्मशास्त्र हें याच अर्थानें एका काळीं रूढ होतें. असंस्कृतांना सुसंस्कृत करणें, संकुचित विचाराच्या लोकांची बुद्धि विकसित करणें, धर्महीनांना धर्मवान् करणें, मनुष्यांना माणुसकी शिकविणें थोडक्यांत म्हणजे संपूर्ण मानवजातीचें उच्चतम कल्याण करणें, हें हिंदुधर्माचें ध्येय व साध्य असल्यामुळें धर्माचें क्षेत्र फार संकुचित आहे, असें म्हणणाऱ्या पक्षाचा वरील आक्षेप आपोआपच खंडित होतो.

( १३ ) धर्मच नको म्हणणारा पक्षः—धर्मावर आक्षेप घेणारा दुसरा एक प्रबल पक्ष आहे. तो म्हणतो कीं धर्म ही एक गुंगी आहे, तो एक कैफ आहे, समाजाची पिळवणूक करण्याचें तें एक चांगलें साधन आहे, म्हणून धर्म हा नष्ट झाला पाहिजे. धर्म नष्ट झाल्याविना समाजाची बुद्धि-हत्या थांबणार नाहीं.

धर्मावर आक्षेप घेणारा हा पक्ष बुद्धिनिष्ठ आहे. धर्म आणि ईश्वर हे शब्द उच्चारले कीं त्यांच्याभोंवतीं जें गूढ, अलौकिक, अपूर्व, अदृष्ट असें कल्पनाजाल उत्पन्न होतें त्याविरुद्ध हा पक्ष आहे. या पक्षाचा नव्या हिंदुधर्मावर तो बुद्धिनिष्ठ असल्यामुळें आक्षेप घेण्याचें मुळींच कारण नाहीं.

(१४) हिंदुधर्म हा पंथ नव्हे —हिंदुधर्म हा एकव्यक्तिनिष्ठ नि एकपुस्तकनिष्ठ पारमार्थिक संप्रदाय या पंथ वा मत नाहीं. एकच साधु, एकच ग्रंथ मानलाच पाहिजे, त्यांत जें आहे तें सर्व परिपूर्ण आहे, त्या विरुद्ध प्रत्यक्ष प्रयोगानें सिद्ध होत असलें तरी काहीं मानावयाचें नाहीं, असे जे आग्रही हिंदुधर्मांतर्गत संप्रदाय आहेत, त्यांच्यावरच या पक्षाचे आक्षेप बरोबर लागू होतात. हिंदुधर्म त्यापलीकडचा आहे.

धर्माच्या नावाखालीं होत असणारी बुद्धिहत्या व पिळवणूक नष्ट करण्यास हिंदुधर्म सदैव सिद्ध आहे. पारलौकिक अदृष्ट व अपूर्व कल्पना-

मुळें समाजात जर दौर्बल्य आणि अनाचार माजत असेल तर तो नाहींसा करण्यास हिंदुधर्माची पूर्ण समति आहे.

(१५) विचारप्रधान धर्म —हिंदुधर्म हा ज्ञानवान् विचारवान् व कर्तृत्ववान् पुरुषांनीं धारणेकरिता, प्रभवाकरितां सांगितलेला तत्त्वसमुच्चय आहे. हिंदुधर्म हा बुद्धिप्रधान, विचारप्रधान, बुद्धीला स्वातंत्र्य देणारा, बुद्धीच्या व्यापाला कोणतीहि मर्यादा न घालणारा, बुद्धीला न पटणाऱ्या तर्कदुष्ट विचाराचा त्याग करण्यास सांगणारा असा धर्म आहे धर्म म्हणजे पंथ, रिलिजन, फेथ, ईश्वरप्राप्तीचा मार्ग, पारलौकिक कल्याणाचा मार्ग, रूढि, आचार, हे संकुचित अर्थ हिंदुधर्माला मुळींच लागू होत नाहींत

(१६) तो अभ्युदयसंबद्ध आहे —हिंदुधर्म हा केवळ परमार्थ-प्रवण व परलोकसंबद्ध संप्रदाय नाहीं हिंदुधर्मांत ज्ञान व विज्ञान, प्रपंच व परमार्थ, अभ्युदय आणि निःश्रेयस, प्रवृत्ति आणि निवृत्ति, भौतिक प्रगति व आध्यात्मिक शांति यांचा तर्कशुद्ध समन्वय आहे. मनुष्याच्या अन्तःशक्तीचा, ज्ञानशक्तीचा, कर्तृत्वशक्तीचा विकास व्हावा, त्यानिमित्त बाह्य परिस्थिति अनुकूल करून घ्यावी, हें सर्व हिंदुधर्माला अभिप्रेत आहे ऐहिक अभ्युदयाला हिंदुधर्मांत पूर्ण स्थान आहे ऐहिक अभ्युदयार्थ आणि कल्याणार्थ जें जें देशकालसापेक्ष करावें लागेल तें तें करण्यास हिंदुधर्माची पूर्ण अनुज्ञा आहे हिंदुसमाजाच्या जीवनाला, अभ्युदयाला व कल्याणाला उपयुक्त असे विचार जुन्या ठेव्यांत मिळाले तर ते अवश्य घ्यावेत, पण ते न मिळाले तर नव्या कालांतील विचार आत्मसात करून समाजधारणा करावी ऐहिक उत्कर्षाच्या आड जर धर्मांतील कांहीं चाली नि रूढी येत असतील तर त्या नष्ट कराव्या व नव्या अभ्युदय साधक रूढी पाडाव्या ऐहिक उन्नतीकरितां समाजरचना बदलावीशी वाटली, तत्त्वप्रणालिका नवीन निर्माण करावीशी वाटली तर तिलाहि हिंदु धर्माची समति आहे तात्पर्य, हिंदुधर्म हा अभ्युदयाला पूर्ण पोषक असल्यामुळें बुद्धिनिष्ठ पक्षाचा आक्षेप लागू पडत नाहीं.

(१७) नवा सामाजिक वेदांत —सर्व जगतांतील घडामोडी अर्थमूलक, काममूलकच चाललेल्या आहेत, अर्थ व काम हेच काय ते पुरुषार्थ आहेत, इतर सर्व झूट आहे अशी जी या पक्षाची विचारसरणी

आहे, तिचा थोडा विचार अवश्य केला पाहिजे. आज जगांत भांडवलशाहीमुळें आणि यंत्रामुळें आर्थिक विषमता उत्पन्न झालेली आहे, यात शंका नाहीं. त्याकरिता मोठमोठाले कारखाने राष्ट्राच्या मालकीचे करावेत असें म्हणण्यांत येतें व तसे प्रयोग चालू आहेत. हिंदुस्थान देश अद्याप कृषिप्रधान आहे. मजूर नि मालक असे दोनच वर्ग हिंदुस्थानांत नाहींत. रयतवारी पद्धति आणि मध्यमवर्ग यांचें अस्तित्व हिंदुस्थानात आहे. हें लक्षात घेतलें म्हणजे मार्क्स–वादाचे सर्व सिद्धांत येथें तंतोतंत अंमलात येणें कठीण दिसतें. शक्तीप्रमाणें करावें व गरजेप्रमाणें घ्यावें आणि सर्व कांहीं सरकारनेंच करावें, ही विचारसरणी ऐदुखाऊ लोकांच्या पथ्यावर पडण्याजोगी आहे. जुन्या निवृत्तिपर वेदांतानें जशी समाजाला मरगळ आणली तशीच मरगळ हा नवा सामाजिक वेदांत आणील कीं काय अशी भीति वाटते.

(१८) ततः किम्—मनुष्याला मुख्य भाकरी पाहिजे, पैसा पाहिजे व तेंच खरें सुखाचें साधन, इतर सर्व थोतांड आहे असें जें म्हणतात, तें मनुष्य स्वभावाविरुद्ध आहे. केवळ जगण्यात माणसाला आनंद वाटत नाहीं, म्हणून तो इतरत्रेची धडपड करतो. सत्ता मिळविणें, उपभोग घेणें, कीर्ति संपादन करणें, चार माणसांकडून भले म्हणवून घेणें हें सर्व मानवी प्रवृत्तींतच येतें. यालाच हिंदुधर्म चार पुरुषार्थ असें म्हणतो. या जगात मुख्य आनंद म्हणजे मानुष आनंद होय ! तो कशानें होतो, हें तैत्तिरीय उपनिषदांत सांगितलें आहे.

युवा स्यात्साधुयुवाध्यायकः ॥ आशिष्ठो द्रढिष्ठो बलिष्ठः ॥
तस्येयं पृथिवी सर्वा वित्तस्य पूर्णा स्यात् ॥ स एको मानुष आनन्दः ॥
—तै. उ. अ. ८.

तरणा जवान आहे, तो भोक्ता, सुदृढ व सुशिक्ष आहे, त्याला ही पृथ्वी संपूर्ण वित्तानें युक्त अशी राज्य करावयास मिळाली तर जो आनंद होतो, तो मानुष आनंद होय. जगात यापेक्षां अर्थकामयुक्त आनंद नाहीं. हिंदुस्थानातील राजेमहाराजे संस्थानिक या मानुषानंदाच्या भूमिकेवर आहेत. पण ते सुखी आहेत काय ? कल्पनेनें का ! होईना पण अनंतकोटीब्रह्मांडांवर एकेक मनुष्य पाठवून तेथील राजा केला

तर तो सुखी होईल काय? श्रीमंत माणसें सुखी असतात असें नाहीं. भाकरी, अर्थ, सत्ता, उपभोग यापलीकडे काहीं एक अध्यात्मिक जीवन आहे. मनुष्य केवळ वासनाचा गोळा नाहीं अध्यात्माचें ज्ञान म्हणजे निर्विषय आनंद ही एक इंद्रियातीत बाब आहे. तिजकडे जाण्याची प्रवृत्तीहि मनुष्यस्वभावातच आहे. अर्थात् तिचा परिपोष धर्माच्या तत्त्वज्ञानानेंच होतो. भाकरी मिळाली, पैसा मिळाला, राज्य मिळालें तरी 'तत किं' हा प्रश्न येतोच. विविध विषयसुख हेंच ध्येय असेल तर तें परिपूर्ण होताच मनुष्यें पटापटा आत्महत्त्या करतील! पण त्याऱ्याहि पुढें 'तत कि' हा प्रश्न असतो व त्याचें उत्तर धर्मांतील अध्यात्माशिवाय मिळत नाहीं.

(१९) अध्यात्माचें महत्त्व–हिंदुधर्मांतील आत्मा, ईश्वर, पुनर्जन्म, कर्मफलप्रक्रिया इत्यादि सिद्धांत प्रश्नचिन्हांकित असले तथापि त्यापेक्षा अधिक तर्कशुद्ध तत्त्वज्ञान जोंवर पुढें येत नाहीं आणि या सिद्धांतामुळें जोंवर जीवनाला उत्तेजन मिळत आहे, तोंवर वरील सिद्धांत उत्कर्ष, अभ्युदय व आत्मोन्नतिसाधक आहेत म्हणून ग्राह्यच समजले पाहिजेत. मनुष्याला शारीरसुखाप्रमाणें बौद्धिक व अध्यात्मिक सुख हवें असतें शारीरसुखापेक्षा मन समाधानाची मातब्बरी अधिक आहे. मी चोरी केली नाहीं, मी अमुक एक निग्रह पाळला, माझ्या हातून व्यभिचार घडला नाहीं, या कल्पनामुळें मनुष्याऱ्या मनाला जें समाधान असतें व जी प्रसन्नता असते, त्याचें वर्णन करावें तेवढें थोडें आहे. स्वार्थ सोडून परार्थ का करावा, अनेक कष्ट सोसून देशाचें व समाजाचें कल्याण करण्यात सुख का मानावें, सर्वस्वाचा त्याग का करावा, याचें सुसबद्ध प्रतिपादन हिंदुधर्मच करतो चोरी केली, खून केला तर शिक्षा होते म्हणून तें करू नये, हे राजदंड सांगतो, पण तू चांगलें कर, भलेपणानें वाग, तुझा व अन्याचा आत्मा एकच आहे, त्यांचें सुखात तुझें सुख आहे, स्वराष्ट्राच्या कल्याणार्थ प्राण समर्पण जरी केला तरी त्यामुळें आत्म्याची उन्नतीच होते इत्यादि तत्त्वें अध्यात्मानेंच कळतात वस्तूच्या भोगात सुख नसून त्यागात सुख आहे, समाजरचना कशी असली तरी सर्व व्यक्तींना सारखेंच सुख मिळेल असें नाहीं, खरें सुख वस्तूचा संग्रह व उपभोग यात नसून तें त्यागात आहे, 'त्यागात् शांतिरनंतरम्' हें शिकण्याचें काम धर्मच करतो या सर्व

